शिरपूर एज्युकेशन सोसायटी, शिरपूर, जि.धुळे द्वारा संचलित अनुदानित आश्रमशाळा शिरपूर, ता.शिरपूर, जि.धुळे ही आश्रमशाळा स्थलांतरित करुन मौ. गरताड, ता.शिरपूर, जि.धुळे येथे चालविण्यास मान्यता देण्याबाबत...

# महाराष्ट्र शासन

## आदिवासी विकास विभाग

**शासन निर्णय क्रमांकः . अआशा-२०२०/प्र.क्र.९२/का-११**

हुतात्मा राजगुरु चौक,मादाम कामा रोड,
मंत्रालय (विस्तार), मुंबई ४०० ०३२.
तारीख : ३ ऑगस्ट , २०२०.

वाचा :

१) आयुक्त, आदिवासी विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, नाशिक यांचे पत्र क्र.अनुआशा - २०१९/प्र.क्र./का-७ (४)/२७२८, दि. २७.०७.२०२०.

## शासन निर्णय:

अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक विभागातील प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, धुळे अंतर्गत शिरपूर एज्युकेशन सोसायटी, शिरपूर, जि.धुळे द्वारा संचलित अनुदानित आश्रमशाळा शिरपूर, ता.शिरपूर, जि.धुळे येथे कार्यरत असून सदर आश्रमशाळा मौ.गरताड, ता.शिरपूर, जि.धुळे येथे स्थलांतरीत करुन चालविण्यास खालील अटींच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे.

अ) गरताड येथे आश्रमशाळा, वसतिगृह व इतर भौतिक सोयी-सुविधांसाठी पुरेशी जागा उपलब्ध असणे आवश्यक आहे.

ब) आश्रमशाळा स्थलांतरीत केल्यानंतर १ वर्षाच्या आत संस्थेने सदर ठिकाणी आश्रमशाळा इमारत, वसतिगृह इमारत यांचे बांधकाम सुरु करणे आवश्यक आहे.

क) सदर ठिकाणी आरोग्य सुविधा, विद्युत सुविधा, पिण्याचे पाणी पुरेशा प्रमाणात उपलब्ध असणे आवश्यक आहे.

ड) सद्यस्थितीत प्रवेशित असणाऱ्या सर्व विद्यार्थ्यांना आश्रमशाळेत सामाऊन घेण्यात यावे.

इ) आश्रमशाळा संहितेमधील निकषानुसार सदर ठिकाणी विद्यार्थ्यांसाठी आवश्यक त्या भौतिक सोयी-सुविधा संस्थेने उपलब्ध करुन देणे आवश्यक आहे.

२. सदर आश्रमशाळा स्थलांतरीत करण्याबाबतची नियमानुसार आवश्यक ती पुढील कार्यवाही अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांनी करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००८०३१२४८१६१७२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Subrao Narayan Shinde

Digitally signed by Subrao Narayan Shinde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ffa7b5a27faed7560194e6272933cfa60dca1eb8ab54859eae7920c9d0d1f622, serialNumber=e5bb5862d0e131a274d92f7a1acef953e01301c1b0fb615dc6cce4812bded257, cn=Subrao Narayan Shinde
Date: 2020.08.03 12:57:43 +05'30'

**( सु.ना.शिंदे )**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१. आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक.
२. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक.
३. आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था,पुणे
४. जिल्हाधिकारी, धुळे.
५.शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, नाशिक
६. प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, धुळे, जि.धुळे.
७. जिल्हा कोषागार अधिकारी, धुळे.
८. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हापरिषद, धुळे.
९. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
१०. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
११. शिक्षणाधिकारी (प्राथमिक), जिल्हा परिषद, धुळे.
१२. शिक्षणाधिकारी (माध्यमिक), जिल्हा परिषद, धुळे.
१३. विभागीय सहसंचालक, धुळे.
१४. अध्यक्ष/सचिव, शिरपूर एज्युकेशन सोसायटी, शिरपूर, जि.धुळे.
१५. मा. मंत्री (आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
१६. मा. राज्यमंत्री (आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१७. मा.सचिव (आदिवासी विकास) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१८. निवड नस्ती (का.११)